**मा.लोकप्रतिनिधींनी सुचविलेल्या ग्रामीण भागातील गावांतर्गत रस्ते, गटारे व अन्य मुलभुत सुविधांच्या कामांबाबत.**

महाराष्ट्र शासन
ग्राम विकास व जलसंधारण विभाग ,
**शासन निर्णय क्र.विकास २००९/प्र.क्र. १९३ /पं.रा.८**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२, दिनांक :- ३ मे , २०११.

**वाचा :**

१) शासन निर्णय, ग्राम विकास व जलसंधारण विभाग
क्र. विकास २००९/ प्र.क्र.८/ पं.रा.८, दि.२४.०२.२००९

२) शासन निर्णय, ग्राम विकास व जलसंधारण विभाग
क्र.झेडपीए-२००८/ प्र.क्र.४७२/ वित्त-९(३३),दि.०९.०२.२००९.

३) शासन निर्णय,ग्राम विकास व जलसंधारण विभाग
क्र.झेडपीए २००८/ प्र.क्र.४४४/ वित्त-९, दि.१५.०७.२००८.

४) शासन निर्णय,ग्राम विकास व जलसंधारण विभाग
क्र.विकास २००९/ प्र.क्र.५७/ पं.रा.८, दि.०२.०६.२००९

५) शासन परिपत्रक ग्राम विकास व जलसंधारण विभाग
क्र.तेविआ २०१०/प्र.क्र.७३/वित्त-४,दिनांक ८.१२.२०१०

**प्रस्तावना :-**

मा.लोकप्रतिनिधींनी सुचविलेल्या ग्रामीण भागातील गावांतर्गत रस्ते ,गटारे व अन्य मुलभूत सुविधांच्या कामांसाठी ग्राम विकास विभागाकडे विशेष निधी मंजूर करण्यासंदर्भात कामाचे निकष व निधी वितरित करण्याची कार्यपध्दती याबाबतचा शासन निर्णय क्र.विकास २००९/ प्र.क्र.८/ पंरा-८, दिनांक २४.०२.२००९ अन्वये निर्गमित करण्यात आलेला आहे.सदर योजनेच्या निकष व कार्यपध्दतीसंदर्भात काही बाबी लोकप्रतिनिधींनी शासनाच्या निदर्शनास आणलेल्या आहेत.त्याअनुषंगाने उपरोक्त दि.२४.०२.२००९ च्या शासन निर्णयामध्ये सुधारणा करण्याची बाब

शासनाच्या विचाराधीन होती. शासनाच्या निदर्शनास आणलेल्या बाबींवर सांगोपांग विचार करुन आता शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**<u>शासन निर्णय</u> :-**

लोकप्रतिनिधींनी सुचविलेल्या गावांतर्गत रस्ते,गटारे व अन्य मुलभूत सुविधांच्या कामासंदर्भात शासन निर्णय क्र.विकास २००९/प्र.क्र.८/पं.रा.८,दिनांक २४ फेब्रुवारी २००९ च्या शासन निर्णयातील परि.२ मध्ये सुधारणा करण्यात येत असून लोकप्रतिनिधींनी सुचविलेल्या कामांबाबत प्राप्त मागण्या विचारात घेवून उपलब्ध निधी वितरित करण्यासंदर्भात आता खालीलप्रमाणे कार्यपध्दती निश्चित करण्यात येत आहे :-

१) सदर योजनेतंर्गत पुढील कामे विचारात घेण्यात येतील :-
गावांतर्गत रस्ते, गटारे,पाऊसपाणी निचरा (storm water drainage), दहनभूमी व दफनभूमीची सुधारणा करणे, संरक्षक भिंत, ग्रामपंचायत कार्यालय बांधकाम करणे, आठवडी बाजारासाठी सुविधा, गावामध्ये कचरा डेपोसाठी व प्राथमिक प्रक्रियेसाठी सुविधा, सार्वजनिक जागेत वृक्ष लागवड व त्यांचे संरक्षण.
वरील कामांव्यतिरिक्त इतर कामांचे प्रस्ताव स्विकारण्यात येणार नाहीत.

२) लोकप्रतिनिधींनी सुचविलेल्या कामांबाबतचे मागणीपत्र/प्रस्ताव शासन स्तरावर स्विकारण्यात येतील. तसेच संबंधित जिल्हा परिषदेच्या मुख्य कार्यकारी अधिकारी यांच्याकडेही लोकप्रतिनिधींकडून मागणीपत्र अथवा प्रस्ताव स्विकारण्यात येतील.

३) मुख्य कार्यकारी अधिकारी यांनी त्यांच्याकडे प्राप्त झालेले सर्व प्रस्ताव एकत्रितपणे विचारात घेवून खालील तक्त्यामध्ये माहे ऑगस्ट अखेरपर्यत शासनास सादर करावेत. कामाचे अंदाजपत्रक तपासण्याची जबाबदारी मुख्य कार्यकारी अधिकारी यांची राहील.शासनास अंदाजपत्रके पाठविण्याची आवश्यकता नाही.

| अ.क्र. | लोकप्रतिनिधीचे नांव | कामाचे नांव (गांव व तालुक्यासह) | अंदाजित रक्कम (रु.लाखात) | शेरा |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |

४) शासन स्तरावर लोकप्रतिनिधींकडून प्राप्त झालेले मागणीपत्र / प्रस्ताव तसेच मुख्य कार्यकारी अधिकारी यांचेकडून त्या त्या जिल्हा परिषदांचा एकत्रित प्रस्ताव शासनास प्राप्त झाल्यानंतर सर्व प्रस्ताव विचारात घेऊन कामाच्या निकडीनुसार तसेच निधीच्या उपलब्धतेनुसार लोकप्रतिनिधींनी सुचविलेल्या कामांसाठी निधी मंजूर करण्याचा निर्णय शासन स्तरावर घेण्यात येईल.

५) शासन स्तरावर मंजुर झालेल्या कामांमध्ये अत्यंत अपवादात्मक परिस्थितीशिवाय बदल करता येणार नाही. कामात बदल करण्याबाबत मुख्य कार्यकारी अधिकारी यांना अधिकार देण्यासंदर्भातील शासन परिपत्रक दि.२.६.२००९ याद्वारे रद्द करण्यात येत आहे. अत्यंत अपवादात्मक परिस्थितीत कामामध्ये बदल करण्याचे अधिकार ग्राम विकास विभागास राहतील. मात्र, कामामध्ये किरकोळ स्वरुपाच्या टंकलेखनाच्या चुका असतील तर त्यामध्ये सुधारणा करण्याचे अधिकार मुख्य कार्यकारी अधिकारी यांना राहतील.

६) सदर योजनेतंर्गत मंजूर झालेली कामे गावाच्या विकासाशी संबंधित असल्याने सदर कामे शासन निर्णय क्र.झेडपीए २००८/प्र.क्र.४७२/ वित्त-९(३३), दिनांक ९.२.२००९ अन्वये दिलेल्या सूचना व घालून दिलेल्या कार्यपध्दतीनुसार ग्रामपंचायतीमार्फत करण्यात यावीत.**तसेच ग्रामपंचायतीची सदर मर्यादा ज्या-ज्या वेळी सुधारित करण्यात येईल त्या सुधारित मर्यादेनुसार ग्रामपंचायतीमार्फत कामे करण्यात येतील.** तेव्हा लोकप्रतिनिधींनी सुचविलेल्या कामांना शासन स्तरावर मंजुरी दिल्यानंतर संबंधित जिल्हा परिषदेच्या मुख्य कार्यकारी अधिकारी यांच्याकडे निधी वितरित करण्यात येईल.मुख्य कार्यकारी अधिकारी यांनी सदर रक्कम मंजूर केलेल्या कामांकरिता खर्च करण्यासाठी त्या त्या ग्रामपंचायतींना गट विकास अधिकाऱ्यांमार्फत सुपूर्द करावी.मंजूर झालेली कामे ग्रामपंचायतीच्या तांत्रिक व वित्तीय मर्यादेबाहेरील असल्यास, सदर कामे जिल्हा परिषदेच्या बांधकाम विभागामार्फत प्रचलित नियमानुसार करण्यात यावीत.सर्व कामांना उपरोक्त शासन निर्णयातील सूचनेनुसार तसेच प्रचलित नियमानुसार प्रशासकीय मंजुरी व तांत्रिक मंजुरी देण्याबाबत कार्यवाही करण्यात यावी.कामावर संपूर्ण नियंत्रण संबंधित जिल्हा परिषदेच्या मुख्य कार्यकारी अधिकारी यांचे राहील. सदर सूचनांची काटेकोरपणे अंमलबजावणी होईल याबाबत मुख्य कार्यकारी अधिकारी यांनी दक्षता घ्यावी.

७) कामांचा दर्जा व गुणवत्ता ही शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या मानकाप्रमाणे असावीत. ती तशी नसल्यास ग्रामपंचायतीचे सरपंच,ग्रामसेवक व कंत्राटदार यांना सामुहिक व वैयक्तिकरित्या जबाबदार धरण्यात येईल.

८) सदर योजनेसाठी गावातील योजनेतंर्गत कार्यक्रमाची अंमलबजावणी तांत्रिकदृष्टया सक्षम व परिणामकारक व्हावी यासाठी संदर्भाधीन क्र.५ वरील दिनांक ८.१२.२०१० च्या शासन परिपत्रकातील तरतुदीनुसार ग्रामपंचायत स्तरावर कनिष्ठ अभियंता नेमण्याची कार्यवाही करण्यात यावी.

अथवा

सदर योजनेसाठी महाराष्ट्र ग्रामीण रोजगार हमी योजनेच्या धर्तीवर गावातील वर नमूद केलेल्या कामांचे प्रकल्प चित्र करणे,सर्व्हे करणे,तंत्रज्ञान इत्यादीसाठी सल्ला देण्याकरिता तांत्रिक पॅनल खालीलप्रमाणे गठित करण्यात यावे :-

(अ) प्रत्येक पंचायत समिती स्तरावर साधारणतः दहा ग्रामपंचायतीसाठी एक याप्रमाणे ग्रामपंचायतींना तांत्रिक सहाय्यासाठी अभियत्यांचे पॅनल मुख्य कार्यकारी अधिकारी, यांचेकडून पारदर्शक पध्दतीचा अवलंब करुन तयार करण्यात यावे.सदर पॅनेलवरील अभियंत्यांचे सहाय्य ग्रामपंचायतींना तांत्रिक सेवा उपलब्ध करुन घेता येईल. (प्लॅन इस्टिमेट तयार करणे, ग्रामपंचायतीचे वतीने तांत्रिक संनियंत्रण करणे,ग्रामपंचायतीने काम बाहेरील कंत्राटदारांना दिले तर त्यांचे कामावर ग्रामपंचायतीच्या वतीने तपासणी करणे इ.) त्यांना आवश्यक शुल्क मुख्य कार्यकारी अधिकारी ठरवून देतील त्या दराने ग्रामपंचायतींनी अदा करावे.यासाठी ग्रामपंचायती व संबंधित अभियंता यांनी करार करावा.कराराचे नूतनीकरण प्रत्येक वर्षी करण्यात येईल.

(ब) या पॅनलमध्ये स्थापत्य अभियंता हा किमान पदविका धारण करणारा असावा व त्यास क्षेत्रिय कामाचा अनुभव असावा. अभियंता पॅनलची निवड जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी, अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी, व कार्यकारी अभियंता (बांधकाम) हे एकत्रितपणे व जाहिरात देवून करतील.

(क) सदर पॅनलकडून प्रत्येक दहा ग्रामपंचायतींसाठी एक अशा नेमलेल्या तांत्रिक कामाचे अन्वेषण करणे,सर्वेक्षण करणे,अंदाजपत्रक तयार करणे,कामांची तांत्रिक मान्यता सक्षम अधिकाऱ्यांकडून प्राप्त करुन घेणे, कामांचे क्षेत्रिय स्तरावर रेखांकन करणे, तांत्रिक मार्गदर्शन करणे,मजूरांना कामांची आखणी करुन देणे, कामांचे मूल्यांकन करणे, मोजमाप पुस्तिकेत मापे नोंदविणे,कामाच्या पूर्णत्वाची कार्यवाही करणे इत्यादी कामे करावी लागतील.

(ड) सदर पॅनल गट विकास अधिकारी यांच्या अधिपत्याखाली पंचायत समितीमध्ये काम करतील.

(इ) वरीलप्रमाणे नियुक्त केलेल्या तांत्रिक सहाय्यकांना कामाच्या अंदाजपत्रकीय रक्कमेच्या १% (एक टक्का) या दराने कामाचा मोबदला देण्यात यावा व ही रक्कम कामाच्या अंदाजपत्रकामध्ये अंतर्भूत करावी.

९) ग्रामपंचायतीने करावयाची कामे सुध्दा जर त्याची किंमत ५ लाखाचेवर असेल व ती कंत्राटदाराकडून करुन घेणार असल्यास ई- निविदा मागवूनच कामे करावी लागतील. जिल्हा परिषदेकडील यादीतील कंत्राटदारांकडून कामे करुन घेता येतील.तसेच ग्रामपंचायत स्वतः काम करणार असल्यास व कंत्राटदार नेमणार नसल्यास खरेदी करावयाच्या मटेरियलच्या प्रत्येक बाबीसाठी जर Procurement ची किंमत रु.५०००० पेक्षा जास्त असल्यास खरेदी ई- निविदेद्वारे करावी.त्यापेक्षा कमी किंमतीची सामुग्री किमान तीन कोटेशन मागवून व ISI प्रतिची खरेदी करावी.

१०)(अ) सदर योजनेंतर्गत होणारी कामे चांगल्या दर्जाची व टिकाऊ व्हावीत यासाठी सध्या प्रधानमंत्री ग्राम सडक योजने अंतर्गत कार्यान्वित असलेल्या राज्य गुणवत्ता समन्वयक (SQC) यांचे अधिपत्यांखालील पॅनेलवरील राज्य गुणवत्ता नियंत्रक (SQM) यांचेकडून संबंधित जिल्हा परिषदेच्या मुख्य कार्यकारी अधिकारी यांनी कामांची तपासणी करुन घ्यावी.यासाठी जिल्हा परिषदेच्या मुख्य कार्यकारी

अधिकारी यांनी राज्य गुणवत्ता समन्वयक (SQC) यांचेकडून आवश्यकतेनुसार यादी घ्यावी व त्याप्रमाणे वाटप करावे. यासाठी अंदाजपत्रकीय रकमेच्या १% (एक टक्का) या दराने मोबदला देण्यात यावा व ही रक्कम कामाच्या अंदाजपत्रकामध्ये अंतर्भूत करावी. सदर यंत्रणेकडून कामाच्या विविध टप्प्यावर तपासणी करण्यात येईल. जिल्हा परिषदेच्या मुख्य कार्यकारी अधिकारी यांनीही अचानकपणे यापैकी कोणत्याही कामाची तपासणी करावी.

**(ब)** वरील परिच्छेदामध्ये नमूद केल्यानुसार कामाची तपासणी करताना सदर कामे अंदाजपत्रकाप्रमाणे करण्यात येत आहेत याची संबंधितांनी खात्री करावी. तसेच आवश्यकता भासल्यास कामांच्या नमुन्यांची प्रयोगशाळेतही चाचणी करता येईल.

**(क)** वरीलप्रमाणे ठरलेल्या टप्प्यानुसार या यंत्रणेकडून गुणवत्ता तपासणी होवून कामाचे दर्जाबाबत प्रमाणित केल्याशिवाय कंत्राटदारांची बिले अदा करता येणार नाहीत.तपासणी यंत्रणेने तपासणी केलेल्या कामांबाबतचे अहवाल संबधित जिल्हा परिषदेच्या मुख्य कार्यकारी अधिकाऱ्यांकडे सादर करण्यात येतील व सदर अहवालांची तपासणी झाल्यानंतर संबंधित कामांची देयके मंजूर करण्यात येतील.

**(ड)** सदर कामांबाबत जनतेच्या तक्रारी उद्‌भवल्यास संबंधित जिल्हा परिषदेच्या कार्यकारी अभियंता (बांधकाम) यांनी समक्ष जागेवर तक्रारीची शहानिशा करावी किंवा स्वतंत्र गुणवत्ता नियंत्रकाकडून फेरतपासणी करावी. जर कामाचा दर्जा निकृष्ट आढळून आल्यास संबंधित तपासणी यंत्रणा जबाबदार राहील.

११) वर परिच्छेद ७) (ई) मध्ये नमूद केलेली १% रक्कम व ८) (अ) येथे नमूद केलेली १% रक्कम या दोन्ही रकमा संबंधित कामाच्या अंदाजपत्रकामध्ये अंतर्भूत असतील व या रकमा शासन स्तरावरुन प्रत्येक कामासाठी मंजूर होणाऱ्या निधीमध्ये समाविष्ट असतील. कोणत्याही परिस्थितीत शासन स्तरावरुन प्रत्येक कामासाठी मंजूर केलेल्या निधीपेक्षा जास्त रक्कम देय होणार नाही.

१२) सदर योजने अंतर्गत होणाऱ्या कामांचे सामाजिक निरिक्षण करण्याच्या दृष्टीने पुढीलप्रमाणे कार्यवाही करण्यात यावी :-

मुंबई ग्रामपंचायत अधिनियम,१९५८ च्या कलम ४९ (१) मधील तरतूदीनुसार ग्रामसभा ग्राम विकास समित्या गठित करु शकतात. त्यानुसार सदर योजनेसाठी ग्रामसभेने एक ग्राम विकास समिती गठित करुन त्याद्वारे सदर योजने अंतर्गत होणाऱ्या कामांचे सामाजिक निरिक्षण करावे व सदर अहवाल जिल्हा परिषदेच्या मुख्य कार्यकारी अधिकाऱ्यांना सादर करावा.

१३) सर्व कामे मुदतीमध्ये पूर्ण होतील यादृष्टीने मुख्य कार्यकारी अधिकारी यांनी नियंत्रण ठेवावे व कामाचे पुर्णत्त्वाचे दाखले व उपयोगिता प्रमाणपत्र मुख्य कार्यकारी अधिकारी यांनी महालेखापाल, विभागीय आयुक्त व शासनास सादर करावेत.

२. सदर शासन निर्णय शासनाच्या www.maharashtra.gov.in वेबसाईटवर उपलब्ध करण्यात येत असून त्याचा संगणक सांकेतांक क्र. **२०११०५०३१२४४२६००१** असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

**( दि.ग.मोरे )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रत -

1. मा.राज्यपाल, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
2. मा.मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
3. मा.उपमुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
4. मा.मंत्री (सर्व), महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
5. मा.राज्यमंत्री (सर्व), महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
6. मा.विधानसभा / विधान परिषद सदस्य (सर्व), विधानमंडळ, मुंबई.
7. अध्यक्ष, जिल्हा परिषद (सर्व)
8. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय,मुंबई.
9. मा.अतिरिक्त मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई.
10. मा.प्रधान सचिव, नियोजन विभाग / वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
11. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर.
12. महालेखापाल (लेखा परीक्षा) महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर.
13. विभागीय आयुक्त (सर्व)
14. जिल्हाधिकारी, जिल्हा (सर्व)
15. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
16. मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
17. मुख्य लेखा परीक्षक ,स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई.
18. उपमुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा, नवी मुंबई, पुणे, नाशिक, औरंगाबाद, नागपूर, अमरावती.
19. सर्व सह सचिव / उप सचिव / विकाअ / अवर सचिव / कार्यासन अधिकारी, ग्राम विकास व जलसंधारण विभाग.
20. निवड नस्ती, का.क्र.पं.रा.८, ग्राम विकास व जलसंधारण विभाग.